**राष्ट्रीय कृषी विकास योजना (RKVY)**
**सन २०१०-११ मध्ये कोकण विभागात सिमेंट नालाबांध व वळण बंधारे कार्यक्रमास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
**शासन निर्णय क्र.राकृवि-२०१०/प्र.क्र.६२/जल-१२**
मंत्रालय , मुंबई -४०००३२
दिनांक :- **१४ ऑक्टोंबर,** २०१०

**वाचा -**

१) शासन निर्णय,कृषी व पदुम विभाग क्र.समिती २००७/प्र.क्र.१/राकृवियो कक्ष, दि.२०सप्टेंबर, २००७
२) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. राकृवि-२००९/प्र.क्र.७३/जल-१२, दि. १२ एप्रिल,२०१०.
३) शासन निर्णय, कृषी व पदुम विभाग क्र.राकृवि-२०१०/प्र.क्र.५२/राकृवियो कक्ष, दि.१३ सप्टेंबर, २०१०
४) संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. मृदसं/मृद४/ राकृवियो /प्रस्ताव/२६०९/२०१०, दिनांक ५/८/२०१०.

**प्रस्तावना -**

राष्ट्रीय विकास परिषदेने (NDC) पारित केलेल्या ठराव क्रमांक ५३ नुसार ११ व्या पंचवार्षिक योजनत ४ टक्के कृषी विकासाचे उदिष्ट ठरविले आहे. हे लक्षात घेऊन केंद्रीय कृषी मंत्रालयाने राष्टीय कृषी विकास योजना (RKVY) जाहिर केलेली आहे. राष्ट्रीय कृषी विकास योजनेअंतर्गत केंद्र शासनाने प्रसिध्द केलेल्या मार्गदर्शक सुचनेनुसार मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भाधीन दिनांक २० सप्टेंबर, २००७ च्या शासन निर्णयानुसार राज्यस्तरीय प्रकल्प मंजूर समिती गठीत करण्यात आलेली आहे. या समितीच्या दिनांक ११ जून,२००९ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार सन २००९-१० मध्ये कोकण विभागातील ठाणे, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग या ४ जिल्ह्यात जलकुंभ, सिमेंट नालाबांध व वळण बंधारे बांधण्याच्या कार्यक्रमास मान्यता दिली असून त्यानुसार सन २००९-१० करीता संदर्भ क्र.२ मधील शासन निर्णयान्वये सदर कार्यक्रम राबविण्यास यापूर्वीच मान्यता देण्यात आली आहे. सदर जलकुंभ, सिमेंट नालाबांध व वळण बंधारे कार्यक्रम कोकण विभागात सध्या सुरु आहे.

राज्यस्तरीय प्रकल्प मंजूर समितीच्या दि. १७ ऑगस्ट, २०१० रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार सन २०१०-११ करिता सदर योजनेतील सिमेंट नालाबांध व वळण बंधारे या कार्यक्रमास मान्यता दिली असून, याकरिता कृषी व पदुम विभागाच्या संदर्भ क्र. ३ मधील दि. १३ सप्टेंबर, २०१० च्या शासन निर्णयान्वये रु. २५.०० कोटी निधी मंजूर केला आहे.

राज्यस्तरीय प्रकल्प मंजूर समितीच्या वरील मान्यतेनुसार राष्ट्रीय कृषी विकास योजनेअंतर्गत सध्या सुरु असलेला कोकण विभागातील सिमेंट नालाबांध व वळण बंधारे हा कार्यक्रम सन २०१०-११ मध्ये पुढे सुरु ठेवण्यास/ राबविण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत सन २०१०-११ मध्ये कोकण विभागातील चार जिल्हयात रु.२५.०० कोटी इतक्या निधीचा "सिमेंट नालाबांध व वळण बंधारे " कार्यक्रम पुढे सुरु ठेवण्यास /राबविण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर सिमेंट नालाबांध व वळण बंधारे कार्यक्रमांतर्गत सन २०१०-११ करीता जिल्हानिहाय भौतिक व आर्थिक उद्दिष्ट खालीलप्रमाणे मंजूर करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | जिल्हा | सिमेंट नालाबांध | | वळण बंधारे | | एकूण रक्कम | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | संख्या | रक्कम (रु.लाखात) | संख्या | रक्कम (रु.लाखात) | संख्या | रक्कम (रु.लाखात) |
| १ | ठाणे | ९६ | ५७३.२५ | २३ | ५१.७५ | ११९ | ६२५.०० |
| २ | रायगड | ८९ | ५३२.७५ | ४१ | ९२.२५ | १३० | ६२५.०० |
| ३ | रत्नागिरी | ८० | ४८१.०० | ६४ | १४४.०० | १४४ | ६२५.०० |
| ४ | सिंधुदुर्ग | ८५ | ५०८.०० | ५२ | ११७.०० | १३७ | ६२५.०० |
| | **एकूण** | **३५०** | **२०९५.००** | **१८०** | **४०५.००** | **५३०** | **२५००.००** |

**३.** या कार्यक्रमाअंतर्गत घ्यावयाचे सिमेंट नालाबांध व वळणबंधारे ही कामे गतिमान पाणलोट विकास कार्यक्रम अंतर्गत निवडण्यात आलेल्या पाणलोटांमध्ये करण्यात यावीत. या पाणलोटांची जिल्हा/ तालुका/ मं.कृ.अ. सजाचे नाव/ पाणलोटाचे नाव/ पाणलोट क्रमांक व पाणलोटाचे एकूण क्षेत्र इत्यादी माहितीसह निवड यादी आयुक्त (कृषी) यांच्या मान्यतेने त्यांच्या स्तरावर निश्चित करुन निर्गमित करण्यात यावी.

**४.** सदर योजनेअंतर्गत घ्यावयाची सिमेंट नालाबांध व वळणबंधारे यांची कामे प्रचलित तांत्रिक मापदंडानुसार करण्यात यावीत. तसेच योजनेच्या अंमलबजावणी संदर्भात संदर्भ क्र. ३ मधील कृषी व पदुम विभागाच्या दि. १३ सप्टेंबर, २०१० च्या शासन निर्णयातील सूचना / निर्देश लागू राहतील.

**५.** राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत सन २०१०-११ मध्ये कोकण विभागात घ्यावयाच्या सिमेंट नालाबांध व वळणबंधारे या कार्यक्रमासाठी शासन निर्णय, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, दि. १३ सप्टेंबर, २०१० अन्वये रु.२५.०० कोटी (रुपये पंचवीस कोटी फक्त) इतका निधी मंजूर केला असून, निधी वितरणाचे आदेश कृषी विभागामार्फत स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

त्यानुसार सदर निधी आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे यांना धनादेशाद्वारे अदा करावा. सदर निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यास संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. संबंधीत जिल्ह्याला मंजूर केलेला निधी जिल्हा स्तरावर जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या **"आत्मा"** संस्थेच्या स्वतंत्र खात्यात जमा करण्यासही शासन मान्यता देत आहे. मंजूर केलेला निधी त्याच कामावर खर्च होईल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित अधिका-याची राहील.

**६.** सदर शासन निर्णय मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूर समितीने दि. १७ ऑगस्ट, २०१०च्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७.  सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. **२०१०१०१४१५१७५५००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( श्या. र. चौरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा. मंत्री (जलसंधारण), यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री.(जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्यस्तरीय जलसंधारण सल्लागार परिषद.
मुख्य सचिव यांचे सहसचिव, सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव,मंत्रालयीन विभाग
सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे,
महासंचालक, कै.वसंतराव नाईक स्वावलंबन मिशन
संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर),पुणे
संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,/सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
सर्व अधीक्षक अभियंता, पाटबंधारे /सर्व अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे,(स्थानिक स्तर)
संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई /महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई (प्रसिध्दी करीता),
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
सर्व सहसंचालक,सामाजिक वनीकरण वृत्त,
सर्व मुख्य वनसंरक्षक / सर्व उपवनसंरक्षक,
सर्व उपायुक्त (विकास),
महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषदेचे सर्व अशासकीय सदस्य,
महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व सह/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी (जलसंधारण उपविभाग) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय. मुंबई
निवडनस्ती जल-१२.

D:\sandip\JAL-12 2010\GR 62 RKVY.lwp